महाराष्ट्र शासन

क्रमांक: बीयुडी.- १६२३/प्र.क्र.२०७/२८-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०२ जून, २०२३.

**विषय :-राज्यातील या विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी लेखाशिर्ष (३०५३ ०१४६) खाली महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस निधी वितरीत करणेबाबत.**

वाचा :- १. वित्त विभाग, का-अर्थ यांचे परिपत्रक, दि.१२.०४.२०२२.
२. अपर जिल्हाधिकारी, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र.मविविकं/२०२३/ वित्त व लेखा/२२६, दि.१८.०५.२०२२

**शासन ज्ञापन :-**

लेखाशीर्ष ३०५३ ०१४६ खाली राज्यातील विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सदर लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी रु.१५.०० कोटी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

२. लेखाशीर्ष ३०५३-०१४६ खाली राज्यातील विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत **रु. १.५० कोटी (रु. एक कोटी पन्नास लाख फ़क्त)** इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर संदर्भाधिन अनुक्रमांक १ नुसार वित्त विभागाने वितरीत केला आहे. सदर अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आलेला निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीला उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**योजनेचे नाव - मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १०२ विमानक्षेत्र, (००) (०१) विमानतळ/ धावपट्ट्या यांचा विकास (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)**

| बाब क्र. | सन २०२३-२४ची मूळ अर्थसंकल्पिय तरतूद | सन २०२३-२४ मध्ये वितरीत करण्यात आलेली रक्कम | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|
| राज्यातील विमानतळ/ धावपट्ट्यांच्या /विकास व्यवस्थापन/ परिरक्षण | रु.१५.०० कोटी | -- | **रु.१.५० कोटी** |
| **एकूण** | **रु. १५.०० कोटी** | **--** | **रु.१.५० कोटी** |

**(अक्षरी रक्कम रुपये एक कोटी पन्नास लाख फ़क्त)**

३. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १०२ विमानक्षेत्र, (००) (०१) विमानतळ/ धावपट्ट्या यांचा विकास (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो दि.३१ मार्च २०२४ पूर्वी खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करुन सदर शासन ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०२३०६०५१६४६१७३२०७ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SHILPA ABHAY CHACHAD

Digitally signed by SHILPA ABHAY CHACHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=3f0b1454eadcb46569c38e868a5b441a8a32b442036ce5c8ffbed5e862cc4202, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=15FE38A4E995535864D6D7BC4CB39F75BB8A6906B9DA526DCB4921B96EE9B6EF, cn=SHILPA ABHAY CHACHAD
Date: 2023.06.05 16:47:28 +05'30'

**( शिल्पा चाचड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, कार्या-व्यय ४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती.